**सहकारी सूतगिरण्यांच्या संचालक मंडळाच्या वैयक्तिक मालमत्तेचे तारण सर्वसाधारण प्रवर्गातील सूतगिरणीकडून १०% इतक्या रक्कमेचे व मागासवर्गीय प्रवर्गातील सूतगिरणीकडून ५% इतके <u>सूतगिरणीच्या संचालकांकडून घेणेबाबत.</u>**

**महाराष्ट्र शासन**

## सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग

**शासन निर्णय क्रमांक : बैठक १५१६/प्र.क्र.६०/टेक्स १ (अ)**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २० जुलै, २०१८.

<u>वाचा</u> :- १) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र. सूतगि-२१९३/ प्र.क्र.१८३/टेक्स-१, दिनांक ११.८.१९९३ .

२) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र. सूतगि- ११९७/ प्र.क्र.१९३/टेक्स-१, दिनांक २४.३.१९९९

३) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र. धोरण- २०११/ प्र.क्र.३३५/टेक्स-२, दिनांक २.१.२०१२

४) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र. धोरण- २०१७/ प्र.क्र.६/टेक्स-५, दिनांक १५.२.२०१८

**<u>प्रस्तावना :-</u>**

आठव्या, दहाव्या व बाराव्या पंचवार्षिक योजनेच्या कालावधीत उभारावयाच्या व शासकीय अर्थसहाय्यासाठी निवडलेल्या सहकारी सूतगिरण्यांना पुर्वीपासून ५:४५:५० या आकृतीबंधानुसार सूतगिरणीने जमा केलेल्या स्वभागभांडवलाच्या प्रमाणात १:९ या प्रमाणात शासकीय भागभांडवल उपलब्ध करुन देण्यात येते. तसेच दि.१५.२.२०१८ च्या शासन निर्णयान्वये नवीन वस्त्रोद्योग धोरण २०१८-२०२३ नुसार १०:३०:६० या आकृतीबंधाप्रमाणे सूतगिरणीस शासकीय भागभांडवल मंजूर करण्याबाबतची कार्यवाही तसेच सूतगिरणीस शासकीय कर्ज/ रा.स.वि.नि. कर्ज/पुनर्वसन कर्ज मंजूरीची कार्यवाही करण्यात येते. वित्त विभागाने दिलेल्या सूचनेनुसार सर्वसाधारण प्रवर्गातील व मागासवर्गीय प्रवर्गातील सहकारी सूतगिरण्यांना शासकीय भागभांडवल/शासकीय कर्ज/रा.स.वि.नि. कर्ज/पुनर्वसन कर्ज मंजूर करताना सदर रकमेच्या २०% रकमेइतके संचालक मंडळाच्या वैयक्तिक मालमत्तेचे तारण घेतल्यानंतरच रकमेची उचल करण्यास परवानगी द्यावी अशी अट अंतर्भूत करण्यात आलेली आहे. तथापी अशा प्रकारे २०% तारण वैयक्तिक मालमत्तेतून देणे अडचणीचे असल्याचे लोकप्रतिनिधींनी शासनाच्या निदर्शनास आणून देवून २०% ची मर्यादा शिथील करावी अशी

विनंती केली आहे. त्यास अनुसरुन सर्वसाधारण प्रवर्गातील सूतगिरणीच्या संचालक मंडळाच्या वैयक्तीक मालमत्तेतून (वितरीत करण्यात येणाऱ्या शासकीय भागभांडवल/ शासकीय कर्ज/रा.स.वि.नि. कर्ज/पुनर्वसन कर्जाच्या रकमेच्या) २०% ऐवजी १०% तसेच मागासवर्गीय प्रवर्गातील सूतगिरणीच्याबाबतीत २०% ऐवजी ५% इतके तारण घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आठव्या, दहाव्या व बाराव्या पंचवार्षिक योजनेच्या कालावधीत उभारावयाच्या व शासकीय अर्थसहाय्यासाठी निवडलेल्या सहकारी सूतगिरण्यांना ५:४५:५० या आकृतीबंधानुसार तसेच दि.१५.२.२०१८ च्या शासन निर्णयान्वये नवीन वस्त्रोद्योग धोरण २०१८-२०२३ नुसार १०:३०:६० या आकृतीबंधानुसार सूतगिरणीने जमा केलेल्या स्वभागभांडवलानुसार सूतगिरणीस मंजूर करण्यात येणा-या शासकीय भागभांडवल तसेच शासकीय कर्ज/ रा.स.वि.नि. कर्ज/पुनर्वसन कर्जाच्या रक्कमेच्या २०% वैयक्तिक मालमत्तेतून तारण घेण्याऐवजी सर्वसाधारण प्रवर्गातील सूतगिरणीसाठी १०% इतक्या रक्कमेचे व मागास प्रवर्गातील सूतगिरणीसाठी ५% इतक्या रक्कमेचे सूतगिरणीच्या संचालकांच्या वैयक्तिक मालमत्तेचे तारण घेतल्यानंतर रक्कम उचल करण्यास मान्यता देण्यास खालील अटींच्या अधीन राहून शासनाची परवानगी आहे.

(अ) सर्वसाधारण प्रवर्गातील सहकारी सूतगिरणीसाठी १०% इतके तारण घेण्यात यावे. संचालक मंडळाचे तारण घेताना प्रति संचालक कमाल २% इतके वैयक्तिक मालमत्तेचे तारण घेण्यात यावे. संचालक मंडळाचे तारण घेत असताना बँकेप्रमाणे नोंदणीकृत तारण घेणे आवश्यक राहील. तसेच तरण तारण नोंदणी कार्यालयाकडे नोंदणीकृत करणे देखील आवश्यक असेल.

(ब) मागास प्रवर्गातील सहकारी सूतगिरणीसाठी ५% इतके तारण घेण्यात यावे. संचालक मंडळाचे तारण घेताना प्रति संचालक कमाल १% इतके वैयक्तिक मालमत्तेचे तारण घेण्यात यावे. संचालक मंडळाचे तारण घेत असताना बँकेप्रमाणे नोंदणीकृत तारण घेणे आवश्यक राहील. तसेच तरण तारण नोंदणी कार्यालयाकडे नोंदणीकृत करणे देखील आवश्यक असेल.

२. जोपर्यंत वितरीत शासकीय भागभांडवल/ शासकीय कर्ज/ रा.स.वि.नि. कर्ज/पुनर्वसन कर्जाच्या रक्कमेच्या सर्वसाधारण प्रवर्गातील सूतगिरणीसाठी १०% व मागास प्रवर्गातील सूतगिरणीसाठी ५% इतक्या रक्कमेचे वरीलप्रमाणे वैयक्तिक तारण प्राप्त होणार नाही, तोपर्यंत वितरीत रक्कम गिरणीस उचल करुन खर्च करता येणार नाही किंवा मंजूर केलेल्या रकमेवर सूतगिरणीस अधिकर्ष (overdraft) काढता येणार नाही. याबाबतचे बंधन वेळोवेळी संचालक वस्त्रोद्योग यांनी संबंधित बँकेवर घालावे. याबाबत संचालक वस्त्रोद्योग यांनी काटेकोरपणे कार्यवाही करावी.

३. तसेच शासकीय भाग भांडवल/ शासकीय कर्ज/ रा.स.वि.नि. कर्ज/पुनर्वसन कर्जा संदर्भात शासनाने भविष्यात आणखी काही अटी व शर्ती निश्चित केल्यास अशा अतिरिक्त अटी व शर्ती सदर सूतगिरणीस लागू राहतील.

४. सदर शासन निर्णय, वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.२९४/२०१८/व्यय-२, दिनांक १७.७.२०१८ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०७२०१७२५३९९००२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vishal Vishvas Madane

Digitally signed by Vishal Vishvas Madane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-op Marketing and Textile, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bb0ed28a897fc87f69fe8807b3d9428966ce3233edb83a20c38834c19f2e3793, cn=Vishal Vishvas Madane
Date: 2018.07.20 17:28:53 +05'30'

**( विशाल मदने )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१ मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर.
२. महालेखापाल, (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-१ मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर.
३. मा. मुख्यमंत्र्यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. मंत्री (वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा. राज्यमंत्री (वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६. सचिव (वस्त्रोद्योग) यांचे स्वीय सहाय्यक, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. कार्यासन अधिकारी (रोखशाखा) , सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
८. अवर सचिव,१७-स/ कार्यासन अधिकारी,१६-स, सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग,मंत्रालय,मुंबई
९. वित्त विभाग, व्यय-२ /व्यय-१५/ अर्थसंकल्प-१३, मंत्रालय, मुंबई-३२.
१०.नियोजन विभाग, कार्यासन-१४३१, मंत्रालय, मुंबई-३२.
११.सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, कार्यासन अजाक/विघयो, मंत्रालय, मुंबई-३२
१२.आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१३.सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१४.संचालक वस्त्रोद्योग, वस्त्रोद्योग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर.

१५.सर्व प्रादेशिक उपसंचालक, वस्त्रोद्योग,

१६.निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,

१७.अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,

१८. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई (२ प्रती),

१९.कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी वस्त्रोद्योग महासंघ मर्यादित,
वकील हाऊस, मुंबई

२०. सर्व सहकारी सूतगिरण्या ( संचालक, वस्त्रोद्योग, नागपूर यांचेमार्फत)

२१. निवडनस्ती (टेक्स १-अ/(टेक्स १-ब))